सन २०२३ खरीप हंगामापासून राज्यांतर्गत अन्नधान्य, कडधान्य व गळीतधान्य पिकांच्या पीक स्पर्धेच्या अंमलबजावणी कार्यपध्दतीमध्ये बदल करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**कृषि,पशुसंवर्धन,दुग्ध व्यवसाय विकास व मत्सव्यवसाय विभाग,**

**शासन निर्णय क्रमांकः-पीक स्पर्धा-२०२२/प्र.क्र ११३/४अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक

मंत्रालय विस्तार भवन,मुंबई-३२

दिनांकः- २० जुलै, २०२३

**संदर्भः-**

१) पीक स्पर्धा नियमावली पुस्तिका जानेवारी, २००२

२) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. पीक स्पर्धा-२०२२/प्र.क्र.११३/४अे, दि.०६ डिसेंबर, २०२२

३) कृषि आयुक्तालयाचे पत्र जा.क्र./कृ.मा.वि./वि.प्र.४/पीक स्पर्धा/१९०२९, दि. ०६ जून, २०२३

**प्रस्तावना:**

राज्यामध्ये पिकांची उत्पादकता वाढविण्यासाठी विविध भागांमध्ये शेतक-यांकडून विविध प्रयोग करण्यात येतात व उत्पादकतेत वाढ करण्यात येते. अशा प्रयोगशील शेतक-यांना, मिळालेल्या उत्पादकतेबाबत प्रोत्साहन देऊन गौरव केल्यास त्यांची इच्छाशक्ती, मनोबल यांमध्ये वाढ होऊन आणखी उमेदीने नवनवीन अद्यावत तंत्रज्ञानाचा वापर केला जातो. यामुळे कृषि उत्पादनामध्ये भर घालण्यासाठी शेतक-यांचे योगदान मिळते. तसेच त्यांचे मार्गदर्शन परिसरातील इतर शेतक-यांना होऊन राज्याच्या एकूण उत्पादनात मोलाची भर पडते, हा उद्देश ठेऊन राज्यांतर्गत पीक स्पर्धा योजना राबविण्यात येत आहे.

सद्यस्थितीत सदरच्या योजनेमध्ये शेतक-याला राज्यस्तरावरील सर्वोच्च पारितोषिक मिळविण्यासाठी स्वतःचे शेतात तीन वर्ष सातत्याने तेच पीक घ्यावे लागते, उत्पादकतेत सातत्य राखावे लागते, दुर्देवाने अवकाळी आपत्कालीन / नैसर्गिक आपत्तीसारखी परिस्थिती उद्भवल्यास उत्पादकतेतील घट शेतक-यांना नाउमेद करते. एकुणतः या बाबी टाळण्यासाठी शेतक-यांना सहभागी होता यावे व एकाच वर्षात त्या पिकाच्या येणा-या उत्पादकतेवर स्पर्धेमध्ये सहभागी होता यावे, या उद्देशाने यापुर्वीच्या पद्धतीमध्ये बदल करण्यात येत आहे. यापुढे सदरची स्पर्धा राज्य, जिल्हा व तालुका स्तरावर स्वतंत्रपणे आयोजित न करता एकाच वर्षात केवळ तालुकास्तरावर आयोजित करणे तसेच राज्य, जिल्हा व तालुका पातळीवरील विजेते हे तालुकास्तराची उत्पादकता ग्राहय धरुन निवडण्यात यावेत. अशी मागणी क्षेत्रिय स्तरावरुन होत आहेत. या उद्देशाने पीक स्पर्धेच्या यापुर्वीच्या कार्यपध्दतीमध्ये बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

पीक स्पर्धेच्या मार्गदर्शक सूचनांमध्ये सुधारणा करण्याकरिता कृषि आयुक्तालयाने या संदर्भाधीन पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावावर साकल्याने विचार करून समित्यांचे पुनर्गठन, पात्रतेचे निकष, विजेते संख्या, स्वरुप, पीक स्पर्धांकरीता वेळापत्रक विहित करणे तसेच विविध स्तरावरील पीक स्पर्धासाठी विहीत करण्यात आलेल्या निकषामध्ये कालानुरूप बदल करण्याची आवश्यकता लक्षात घेवून पीक स्पर्धाबाबत यापुर्वीचा दि.०६ डिसेंबर, २०२२ चा शासन निर्णय या निर्णयाद्वारे अधिक्रमीत करून सन २०२३ खरीप हंगामापसून पीक स्पर्धेच्या निकषामध्ये बदल करणेसंबधीची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

वंचित/दुर्लक्षित तसेच पौष्टिक तृणधान्य पिकांच्या क्षेत्रात आणि उत्पादन तंत्रज्ञानात वाढ होण्याची आवश्यकता विचारात घेऊन तसेच जास्तीत जास्त शेतकरी पीक स्पर्धामध्ये सहभागी होतील या दृष्टीकोनातून पीक स्पर्धांच्या निकषांबाबतचा संदर्भाधीन दि.०६ डिसेंबर, २०२२ रोजीचा शासन निर्णय अधिक्रमीत करून पीक स्पर्धाच्या निकषांमध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यास सदर शासन निर्णयान्वये मान्यता देत आहे.

**१. पीक स्पर्धेतील पिके** : हंगामनिहाय पिके

●खरीप पीके -भात, ज्वारी, बाजरी, मका, नाचणी (रागी), तूर, मूग, उडीद, सोयाबीन, भुईमुग, सुर्यफुल (एकूण ११ पिके)

●रब्बी पीके- ज्वारी, गहू, हरभरा, करडई, जवस (एकूण ०५ पिके)

**२. पीक स्पर्धेमध्ये सहभाग घेण्यासाठी पात्रता निकष (स्पर्धक संख्या, पीक स्पर्धा क्षेत्र, कापणी प्रयोग घ्यावयाची संख्या):-**

- स्पर्धेत भाग घेण्यासाठी शेतकऱ्याकडे स्वतःच्या नावावर जमीन असणे व ती जमीन तो स्वत: कसत असणे आवश्यक आहे.
- स्पर्धेत भाग घेणा-या शेतक-याला एकाच वेळी एकापेक्षा जास्त पिकासाठी स्पर्धेत सहभाग घेता येईल.
- पीक स्पर्धामध्ये सहभागी लाभार्थीचे स्वतःच्या शेतावर त्या पिकाखाली भात पिकासाठी किमान २० आर क्षेत्रावर व इतर पिकासाठी ४० आर क्षेत्रावर सलग लागवड असणे आवश्यक आहे.
- पीक स्पर्धेसाठी जेवढे अर्ज प्राप्त होतील ते सर्व शेतकरी पीक स्पर्धेकरीता पात्र राहतील.
- पीक स्पर्धामध्ये राज्यस्तरावर प्रथम क्रमांक मिळवलेल्या शेतकऱ्याला पुढील पाच वर्ष त्याच पिकाकरिता पीक स्पर्धेत सहभाग घेता येणार नाही.
- पीक स्पर्धामध्ये राज्य ते तालुका स्तरावरील विजेत्या स्पर्धकास ज्या क्रमांकाचे बक्षीस मिळाले आहे त्या स्तरावरील त्या क्रमांकाच्या खालचा स्तर व क्रमांकाकरिता स्पर्धकास त्याच पिकासाठी पुढील पाच वर्ष स्पर्धक म्हणून बक्षीसासाठी ग्राह्य धरले जाणार नाही तथापि विजेता स्तरावरील त्या क्रमांकाच्या वरील स्तर व क्रमांकाकरिता स्पर्धक स्पर्धेमध्ये सहभाग घेऊन बक्षीसासाठी पात्र राहील.
- **पीक स्पर्धा जाहीर करणे** - खरीप व रब्बी हंगामापूर्वी संपूर्ण राज्यामध्ये आयुक्त (कृषी) हे स्पर्धा जाहीर करतील व त्यास प्रसिद्धी देतील. तद्नंतर सर्व क्षेत्रीय कार्यालयांनी त्याची आपले स्तरावरून व्यापक प्रचार प्रसिद्धी करावी.

**३. अर्ज करण्यासाठी आवश्यक कागदपत्रे -** पीक स्पर्धेत भाग घेऊ इच्छिणाऱ्या स्पर्धकांनी खालील कागदपत्रांची पूर्तता संबंधीत तालुका कृषि अधिकाऱ्यांकडे करावयाची आहे.

- विहित नमुन्यातील अर्ज
- ठरवून दिलेले प्रवेश शुल्क भरल्याचे चलन
- ७/१२, ८-अ चा उतारा
- जात प्रमाणपत्र (केवळ आदिवासी असल्यास)

**४. अर्ज दाखल करण्याची अंतीम तारीख -**

निरनिराळ्या हंगामामध्ये पीक स्पर्धेची अर्ज दाखल करण्याची तारीख खालील प्रमाणे राहिल.

➢ **खरीप हंगाम -**

- मूग व उडीद पीक - ३१ जुलै
- भात, ज्वारी, बाजरी, मका, नाचणी (रागी), तूर, सोयाबीन, भुईमुग व सुर्यफुल - ३१ ऑगस्ट

➢ **रब्बी हंगाम -**

- ज्वारी, गहू, हरभरा, करडई व जवस - ३१ डिसेंबर

➢ अर्ज दाखल करण्याच्या अंतिम तारखेच्या दिवशी शासकीय सुट्टी असल्यास त्यापुढील शासकीय सुट्टी नसलेली तारीख गृहीत धरण्यात यावी.

**५. स्पर्धेसाठी प्रवेश शुल्क :**

- पिकनिहाय (प्रत्येक पिकासाठी स्वतंत्र) सर्वसाधारण गटासाठी रक्कम रु.३०० व आदिवासी गटासाठी रक्कम रु. १५० राहिल.
- सहभागी शेतकऱ्यांनी प्रवेश शुल्क स्वतः खालील लेखा शिर्षामधे शासकीय कोषागारात विहीत मुदतीत जमा करावे.

| मराठी | इंग्रजी |
|---|---|
| ०४०१- पीक संवर्धन<br>१०४- शेती क्षेत्रांपासून प्राप्त जमा रकमा<br>(००)(०२) - पीक स्पर्धा योजनेखालील जमा रकमा<br>०४०१०४७३०१ | 0401- Crop Husbandry<br>104 - Receipts from Agricultural Farms<br>(00)(02) - Receipts under crop competition scheme<br>0401047301 |

- सहभागी शेतक-यास प्रवेश शुल्क परत दिले जाणार नाही.
- पीक स्पर्धेत भाग घेतलेल्या स्पर्धकाने स्पर्धेतून माघार घ्यावयाची झाल्यास कापणीपूर्वी १५ दिवस अगोदर माघार घेत असल्याचे तालुका कृषी अधिकारी कार्यालयास लेखी कळवावे. तसेच माघार कोणत्या कारणासाठी घेतली हे अर्जात सुस्पष्ट नमुद करावे मात्र प्रवेश शुल्क परत केले जाणार नाही.

**६. स्पर्धेत भाग घेणाऱ्या शेतकऱ्यांची/स्पर्धकांची जबाबदारी -**

- स्पर्धक शेतकऱ्याने ज्या पिकाकरीता स्पर्धेमध्ये सहभाग घेतला आहे त्या अनुषंगाने पीक पेरणी ते काढणी पर्यंतची सर्व माहिती विहित प्रपत्रामध्ये भरून पीक कापणीच्या वेळेस कापणी समितीच्या सचिवाकडे जमा करणे बंधनकारक राहील.
- पीक कापणीच्या किमान १५ दिवस अगोदर तालुका कृषी अधिकारी यांना पीक कापणीची तारीख कळवणे बंधनकारक राहील.
- पीक कापणीच्या दिवशी कापणी व मळणीच्या अनुषंगाने सर्व तयारी करून ठेवण्याची जबाबदारी व त्याकरिता आवश्यक खर्चाची जबाबदारी स्पर्धकाची राहील.
- पीक कापणी समितीस सर्व आवश्यक ते सहकार्य करणे.

**७. पीक कापणी समिती**

**अ) पीक कापणी करण्यासाठी तालुका पातळीवर खालीलप्रमाणे पीक कापणी समिती स्थापन करण्यात आली आहे.**

| | | |
|---|---|---|
| १ | उ.वि.कृ.अ यांनी आदेशित केलेले तं.अ./असंबंधित ता.कृ.अ./ मं.कृ.अ./कृ.अ. | अध्यक्ष |
| २ | कृषी अधिकारी (पंचायत समिती) | सदस्य |
| ३ | संबंधित मंडळ कृषी अधिकारी | सदस्य |
| ४ | संबंधित गावचे सरपंच किंवा सरपंचाने प्राधिकृत केलेला ग्रा.पं. सदस्य | सदस्य |
| ५ | ग्राम कृषी विकास समिती सदस्य | सदस्य |
| ६ | कृषी पर्यवेक्षक | सदस्य |
| ७ | संबंधित कृषी सहाय्यक | सदस्य सचिव |

**ब) पीक कापणी समितीची कार्ये –**

- पीक कापणी समितीतील सदस्यांनी पीक कापणी वेळी उपस्थित राहावे.
- पीक कापणी व मळणी समितीच्या समक्ष करुन घेणे.
- आलेल्या उत्पादकतेची आकडेवारी योग्य असल्याबाबत खात्री करणे व विहीत प्रपत्रामध्ये उत्पादकतेच्या आकडेवारीची नोंद घेणे.
- पीक स्पर्धेतील पिकांची पीक कापणी झाल्यानंतर पीक कापणीची सर्व समिती सदस्यांच्या स्वाक्षरीची विहित प्रपत्रामधील माहिती, प्रक्षेत्रावरील कापणीचे दोन फोटो(सॉफ्ट कॉपी व हार्डकॉपीमध्ये ) तालुका कृषी अधिकारी कार्यालयास सादर करणे.

**८. पीक कापणी प्रयोगासाठी प्लॉटची निवड व मोजमापे –**

- पीक स्पर्धातील पिकांच्या कापणीसाठी प्लॉटची निवड व मोजमापे निश्चित करणेबाबत सांख्यिकी विभागाच्या पीक कापणीधर्तीवर कृषी आयुक्तालय स्तरावरून मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात याव्यात.

**९. पीक कापणी बाबतच्या सूचना –**

- पीक स्पर्धामध्ये सहभागी झालेल्या व कापणीस इच्छुक असलेल्या सर्व स्पर्धकांची पीक कापणी करणे आवश्यक आहे.
- पीक स्पर्धा प्लॉटची कापणी व मळणी एकाच दिवशी पीक कापणी समितीच्या समक्ष करण्यात यावी.
- पीक कापणी व मळणी झाल्यानंतर आलेल्या उत्पादकेतेची आकडेवारी कळविताना सांख्यिकी विभागाच्या सूचनेनुसार सुकवणी गुणोत्तर (Driage Ratio) असल्यास त्याचा वापर करून अंतिम उत्पादकतेची आकडेवारी निश्चित करावी. तसेच भात पिकाच्या बाबतीत साळीचे रुपांतर तांदळामध्ये करून अंतिम उत्पादकता विहित प्रपत्रात कळवावी.

**१०. पीक कापणी प्रयोगाचे पर्यवेक्षण –**

- उपविभागीय कृषी अधिकारी यांनी आपल्या अधिनस्त कार्यक्षेत्रातील किमान १० स्पर्धकांच्या पीक स्पर्धातील पिकांच्या पीक कापणीस उपस्थित राहावे.
- जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी यांनी आपल्या अधिनस्त कार्यक्षेत्रातील किमान ३ स्पर्धकांच्या पीक स्पर्धातील पिकांच्या पीक कापणीस उपस्थित राहावे.
- विभागीय कृषी सहसंचालक यांनी आपल्या अधिनस्त कार्यक्षेत्रातील किमान २ स्पर्धकांच्या पीक स्पर्धातील पिकांच्या पीक कापणीस उपस्थित राहावे.

**११. पीक स्पर्धा निकाल घोषित करणेसाठी खालीलप्रमाणे तालुका, जिल्हा, व राज्य स्तरावर पीक स्पर्धा निकाल समिती स्थापन केल्या आहेत.**

**अ) तालुकास्तर पीक स्पर्धा निकाल समिती –**

| | | |
|---|---|---|
| १ | संबंधित तालुका कृषि अधिकारी | अध्यक्ष |
| २ | तालुक्यातील सर्व मंडळ कृषि अधिकारी | सदस्य |
| ३ | तालुका कृषि अधिकारी कार्यालयातील कृषि अधिकारी | सदस्य सचिव |

**ब) जिल्हास्तर पीक स्पर्धा निकाल समिती-**

| | | |
|---|---|---|
| १ | संबंधित जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी | अध्यक्ष |
| २ | संबंधित कृषि विकास अधिकारी | सदस्य |
| २ | सर्व उपविभागीय कृषि अधिकारी | सदस्य |
| ३ | संबंधित जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी कार्यालयातील कृषि उपसंचालक | सदस्य सचिव |

**क) राज्यस्तर पीक स्पर्धा निकाल समिती-**

| | | |
|---|---|---|
| १ | मा. आयुक्त, (कृषि) | अध्यक्ष |
| २ | कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण) कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे | सदस्य |
| ३ | कृषि सहसंचालक (वि.प्र.-१) कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे | सदस्य |
| ४ | कृषि सहसंचालक (वि.प्र. २) कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे | सदस्य |
| ५ | कृषि सहसंचालक (वि.प्र. ३) कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे | सदस्य |
| ६ | मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे | सदस्य |
| ७ | कृषि उपसंचालक (माहिती) कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे | सदस्य सचिव |

- पीक स्पर्धेबद्दल अंतिम निर्णय घेण्याचा अधिकार या समितीला आहे व हा निर्णय सर्व सहभागी स्पर्धकांना बंधनकारक राहील.

**१२. पीक स्पर्धेचा निकाल -**

- ज्या शेतक-याची स्पर्धेत भाग घेतलेल्या पिकाची उत्पादकता तालुक्याच्या त्या पिकाच्या सरासरी उत्पादकतेच्या (त्या पिकाची मागील ५ वर्षाची सरासरी उत्पादकता) दिडपट किंवा त्यापेक्षा अधिक आहे अशा शेतक-यांना पीक स्पर्धेतील पुरस्कारासाठी पात्र समजण्यात यावे. त्यापेक्षा कमी उत्पादकता असणारे शेतकरी पीक स्पर्धा पुरस्कारासाठी अपात्र समजण्यात येतील.
- ज्या पिकाच्या सरासरी उत्पादकतेची तालुकास्तरावर अधिकृत माहिती उपलब्ध नसेल अशा ठिकाणी जिल्ह्याच्या सरासरी उत्पादकतेची (त्या पिकाची मागील ५ वर्षाची सरासरी उत्पादकता) आकडेवारी ग्राहय धरावी. जिल्हयाच्या सरासरी उत्पादकतेची आकडेवारी उपलब्ध नसल्यास राज्याच्या त्या पिकाच्या सरासरी उत्पादकतेची (त्या पिकाची मागील ५ वर्षाची सरासरी उत्पादकता) आकडेवारी ग्राह्य धरण्यात यावी. या उत्पादकतेच्या दीडपट किंवा त्याहून अधिक उत्पादकता असणारे शेतकरी पीक स्पर्धा पुरस्कारासाठी पात्र समजण्यात येतील. त्यापेक्षा कमी उत्पादकता असणारे शेतकरी पुरस्कारासाठी अपात्र समजण्यात येतील.
- पीक स्पर्धेत तालुक्यातून सहभागी झालेल्या स्पर्धकांची पीक कापणी झाल्यानंतर पीक कापणी समितीने पीक कापणी बाबतची माहिती विहित प्रपत्रामध्ये तालुका कृषी अधिकारी यांचेकडे सादर करावी.
- तालुका कृषि अधिकारी यांनी तालुकास्तरावर पिकनिहाय प्राप्त उत्पादकतेच्या आकडेवारीनुसार सर्वसाधारण व आदिवासी शेतकऱ्यांचे गुणानुक्रमे जास्तीत जास्त पहिल्या नऊ शेतकऱ्यांची आकडेवारी संबंधित जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी यांचेकडे विहित प्रपत्रामध्ये सादर करावी.

- जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी यांनी जिल्हास्तरावर तालुकास्तरावरुन पिकनिहाय प्राप्त उत्पादकतेच्या आकडेवारीनुसार सर्वसाधारण व आदिवासी शेतकऱ्यांचे गुणानुक्रमे जास्तीत जास्त पहिल्या सहा शेतकऱ्यांची माहिती संबंधित विभागीय कृषी सहसंचालक यांचेकडे विहित प्रपत्रामध्ये सादर करावी.
- विभागीय कृषी सहसंचालक यांनी विभागस्तरावर जिल्हास्तरावरुन पिकनिहाय प्राप्त उत्पादकतेच्या आकडेवारीनुसार सर्वसाधारण व आदिवासी शेतकऱ्यांचे गुणानुक्रमे जास्तीत जास्त पहिल्या तीन शेतकऱ्यांची माहिती कृषी उपसंचालक (माहिती) कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेकडे विहित प्रपत्रामध्ये सादर करावी.
- राज्यस्तरीय पीक स्पर्धा निकाल समितीने विभाग स्तरावरून प्राप्त स्पर्धकांच्या उत्पादकतेच्या माहितीच्या आधारे राज्यस्तरावरून पीक स्पर्धाचा पिकनिहाय सर्वसाधारण व आदिवासी गटाकरिता निकाल घोषित करावा. राज्यस्तरीय पीक स्पर्धाचा निकाल प्रथम घोषित करण्यात यावा.
- राज्यस्तरावरील निकाल घोषित झाल्यानंतर राज्यस्तरावरील प्रथम, द्वितीय व तृतीय क्रमांकाचे पीक स्पर्धा विजेते वगळून जिल्हास्तरीय पीक स्पर्धा निकाल समितीने संबंधित जिल्ह्याच्या कार्यक्षेत्रातील स्पर्धकांमधून जिल्हास्तरावरील पिकनिहाय सर्वसाधारण व आदिवासी गटाकरिता प्रथम, द्वितीय व तृतीय क्रमांकाचे पीक स्पर्धा विजेत्यांची निवड करुन निकाल घोषित करावेत.
- राज्य आणि जिल्हास्तरावरील प्रथम, द्वितीय व तृतीय क्रमांकाचे पीक स्पर्धा विजेते वगळून तालुकास्तरीय पीक स्पर्धा निकाल समितीने संबंधित तालुक्याच्या कार्यक्षेत्रातील स्पर्धकांमधून पिकनिहाय सर्वसाधारण व आदिवासी गटाकरिता तालुकास्तरावरील प्रथम, द्वितीय व तृतीय क्रमांकाचे पीक स्पर्धा विजेत्यांची निवड करुन निकाल घोषित करावेत.

**१३. पीक स्पर्धा विजेते – बक्षिसाचे स्वरूप व वितरण**

| **अ.क्र** | **स्पर्धा पातळी** | **सर्वसाधारण व आदिवासी गट बक्षिस रुपये** | | |
|---|---|---|---|---|
| | | **पहिले** | **दुसरे** | **तिसरे** |
| १ | तालुका पातळी | ५,००० | ३,००० | २,००० |
| २ | जिल्हा पातळी | १०,००० | ७,००० | ५,००० |
| ३ | राज्य पातळी | ५०,००० | ४०,००० | ३०,००० |

- खरीप व रब्बी हंगामातील जिल्हा व तालुका पातळीवरील पीक स्पर्धा विजेत्या स्पर्धक शेतकऱ्यांना सन्मानपूर्वक बक्षीस वितरण जिल्हास्तरावर करावे.
- खरीप व रब्बी हंगामातील राज्य पातळीवरील पीक स्पर्धा विजेत्या स्पर्धक शेतकऱ्यांना सन्मानपूर्वक बक्षीस वितरण राज्यस्तरावर करावे.

**१४. सर्वसाधारण सूचना –**

- पीक स्पर्धासाठी जास्तीत जास्त शेतकरी सहभागी होतील याबाबत आयुक्तालय आणि क्षेत्रिय स्तरावरुन प्रयत्न करण्यात यावेत.
- पीक स्पर्धा राबविणेबाबतची सर्व जबाबदारी संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांचेवर व संनियंत्रणाची जबाबदारी विभागीय कृषि सहसंचालक यांची राहील.

**१५.** पीक स्पर्धाच्या अंमलबजावणीकरीता आयुक्त (कृषि) यांच्या स्तरावरून विहित नमुने/प्रपत्र व सविस्तर मार्गदर्शक सुचना निर्गमीत करण्यात यावेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०७२०१६०१४३२८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANTOSH
BANSIRAO
KARAD

Digitally signed by SANTOSH BANSIRAO KARAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA,
ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=f981d5a9fec2e5d5dc36f39695b5f0e4ff5b340
cd5420df7cbaa28990d692e36, postalCode=400032,
st=Maharashtra,
serialNumber=90BBB9D3E7E74DE43F8070E2A9A65BF
D42747F1995A4F22FDC0240939AAB0835,
cn=SANTOSH BANSIRAO KARAD
Date: 2023.07.20 16:02:57 +05'30'

**( संतोष कराड )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधान सभा
३. सर्व मा.विधान परिषद/विधानसभा सदस्य, महाराष्ट्र राज्य
४. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
५. मा.उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
६. मा. मंत्री, (कृषि) यांचे खाजगी सचिव
७. अपर मुख्य सचिव,कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८. आयुक्त (कृषि) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१०. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर
११. उप सचिव (४-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१२. कृषि संचालक, (सर्व) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१३. विभागीय कृषि सहसंचालक, सर्व
१४. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, सर्व
१५. तालुका कृषि अधिकारी, सर्व
१६. निवड नस्ती-४अे.